नोंदणी व मुद्रांक विभागातील सह जिल्हा निबंधक, वर्ग-१ (निम्नश्रेणी) व सह जिल्हा निबंधक, वर्ग-१ (उच्चश्रेणी) या संवर्गांचे एकत्रीकरणाबाबत......

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: आस्थाप-२०१८/६७६/प्र.क्र.७५/म-१**
दालन क्र.म-७अ,पोटमाळा,मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय(विस्तार इमारत),मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २२.०५.२०२०.

वाचा- १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.,आस्थापना-१०९७/२१९८/प्र.क्र.६१६/म-१, दि.२९.१०.१९९७.
२) महसूल व वन विभाग ,शासन निर्णय क्र.आस्थापना-२००१/ प्र.क्र.२९८/म-१, दि.३०.११.२००२.
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.आस्थापना-२००३/३०८५/ प्र.क्र.६४६/म-१, दि.२३.०७.२००४.
४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.आस्थापना-२००४/ ४०१३ /प्र.क्र.६८७/म-१, दि.३०.१२.२००५.

प्रस्तावना :

नोंदणी व मुद्रांक विभागाच्या आस्थापनेवरील सह जिल्हा निबंधक,वर्ग-१ हा संवर्ग शासन निर्णय क्र.महसूल व वन विभाग ,आस्था.१०.९७/२१९८/ प्र.क्र.६१६/म-१,दि.२९.१०.१९९७ नुसार निर्माण करण्यात आला.तद्नंतर शासन निर्णय क्र.आस्थापना-२००१/ प्र.क्र.२९८/म-१,दि.३०.११.२००२ अन्वये सह जिल्हा निबंधक,वर्ग-१(निम्नश्रेणी) हा संवर्ग निर्माण करण्यात आला आहे.सद्यस्थितीत सह जिल्हा निबंधक,वर्ग-१ (उच्चश्रेणी) या संवर्गात २१ पदे मंजूर आहेत व सह जिल्हा निबंधक,वर्ग-१(निम्नश्रेणी) या संवर्गात ३३ पदे मंजूर आहेत. सह जिल्हा निबंधक,वर्ग-१(निम्नश्रेणी) व सह जिल्हा निबंधक,वर्ग-१ (उच्चश्रेणी) या दोन्ही संवर्गाची कर्तव्ये,जबाबदारी आणि कामाचे स्वरुप एकसमान आहे. सह जिल्हा निबंधक(निम्नश्रेणी) या संवर्गाशी समकक्ष असणा-या सहाय्यक नोंदणी महानिरीक्षक या संवर्गाचा सध्याचा दर्जा त्या पदाची कर्तव्ये प्रभावीपणे पार पाडण्याकरिता प्रशासकीयदृष्ट्या वरिष्ठ दर्जाचा असणे आवश्यक आहे.नोंदणी उपमहानिरीक्षक व सह जिल्हा निबंधक,वर्ग-१(उच्चश्रेणी) या संवर्गामधील पदे सेवानिवृत्तीमुळे सातत्याने रिक्त होत असतात,सह जिल्हा निबंधक,(निम्नश्रेणी) संवर्गात ३ वर्षे सेवा पूर्ण झालेले अधिकारी उपलब्ध होत नसल्याने सह जिल्हा निबंधक,वर्ग-१(उच्चश्रेणी) व त्यावरील नोंदणी उपमहानिरीक्षक संवर्गातील पदे प्रदीर्घ काळ रिक्त राहतात.अशा परिस्थितीत नजिकच्या जिल्ह्यातील सह जिल्हा निबंधकाकडे अतिरिक्त कार्यभार सोपवून कामकाज चालविले जाते.मात्र सह जिल्हा निबंधक हे जिल्हा स्तरीय पद असून त्या पदावरील कर्तव्ये व जबाबदा-या यथोचित रित्या पार पाडण्यासाठी सदर सर्व पदे नियमित अधिका-यांच्या नियुक्तीने भरली जाणे आवश्यक आहे. सदरची वस्तुस्थिती व सह जिल्हा निबंधक,वर्ग-१(उच्चश्रेणी) व सह जिल्हा निबंधक,वर्ग-१(निम्नश्रेणी) या दोन संवर्गांचे समान कामाचे स्वरुप विचारात घेता प्रशासकीय गतीमानता व महसूल वृद्धी या दृष्टीने संवर्ग व्यवस्थापन करणे आवश्यक आहे.या अनुषंगाने सह जिल्हा निबंधक,वर्ग-१(निम्नश्रेणी) या संवर्गाचे सह जिल्हा निबंधक,वर्ग-१(उच्चश्रेणी) या संवर्गात एकत्रीकरण (Amalgamation) करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

महसूल व वन विभागाच्या अधिपत्याखालील नोंदणी व मुद्रांक विभागाच्या आस्थापनेवरील सह जिल्हा निबंधक,वर्ग-१ (निम्नश्रेणी) व सह जिल्हा निबंधक,वर्ग-१(उच्चश्रेणी) या संवर्गाच्या एकत्रिकरणास मंजूरी देण्यात येत आहे.

२. नोंदणी व मुद्रांक विभागाच्या आस्थापनेवरील "सह जिल्हा निबंधक,वर्ग-१ (निम्नश्रेणी)" व "सह जिल्हा निबंधक,वर्ग-१(उच्चश्रेणी)" या दोन संवर्गाचे एकत्रिकरण करुन एकच "सह जिल्हा निबंधक,वर्ग-१" हा संवर्ग निर्माण करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे :-

१) नोंदणी व मुद्रांक विभागाने सह जिल्हा निबंधक,वर्ग-१ (निम्नश्रेणी) व सह जिल्हा निबंधक,वर्ग-१(उच्चश्रेणी) या संवर्गाच्या एकत्रिकरणानंतर सदर संवर्गातील अधिका-यांची सेवाज्येष्ठता निश्चित करताना,ज्येष्ठतासूची अंतिम करताना,निवडसूची तयार करताना कोणावरही अन्याय होणार नाही,याची दक्षता घ्यावी.

२) सदर दोन संवर्गाच्या एकत्रिकरणानंतर "सह जिल्हा निबंधक,वर्ग-१ (निम्नश्रेणी)" हे पद धारण करणा-या अधिका-यांची ज्येष्ठता "सह जिल्हा निबंधक,वर्ग-१(उच्चश्रेणी)" या संवर्गातील अधिका-यानंतर त्यांच्या "सह जिल्हा निबंधक,वर्ग-१ (निम्नश्रेणी)" या संवर्गातील ज्येष्ठता क्रमानुसार निश्चित करण्यात यावी.जेणेकरुन भविष्यात मानीव दिनांक,पदोन्नती संदर्भातील प्रकरणे , न्यायालयीन प्रकरणे उद्भवणार नाहीत.

३) नोंदणी व मुद्रांक विभागाच्या आस्थापनेवरील "सह जिल्हा निबंधक,वर्ग-१ (निम्नश्रेणी)" व "सह जिल्हा निबंधक,वर्ग-१(उच्चश्रेणी)" या दोन संवर्गाचे एकत्रिकरण करुन निर्माण करण्यात आलेल्या सह जिल्हा निबंधक,वर्ग-१ या संवर्गाच्या सुधारित सेवाप्रवेश नियमाच्या प्रस्तावास सामान्य प्रशासन विभागाची मान्यता घेण्यात यावी.

४) सह जिल्हा निबंधक,वर्ग-१ या संवर्गाची ७ व्या वेतन आयोगानुसार वेतनसंरचना S-२०:५६१००-१७७५०० अशी राहील.

३. सदरचे आदेश दि.०१ एप्रिल,२०२० पासून अंमलात येतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००५२२१६२५५०६९१९ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tanaji Dhondiram Saravane

Digitally signed by Tanaji Dhondiram Saravane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d2468c3c73dea535f5c36d6896860fd3419597af89877af8e0848 88bd31c4fab, cn=Tanaji Dhondiram Saravane
Date: 2020.05.22 17:29:09 +05'30'

**( ता.धों.सरावणे )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक,महाराष्ट्र राज्य,पुणे.

**प्रत,**

१) सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हा निबंधक,महाराष्ट्र राज्य.

२) मा.मंत्री(महसूल) यांचे खाजगी सचीव,मंत्रालय,मुंबई-३२
३) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-३२
४) महालेखापाल ½ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर.
५) महालेखापाल ½ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर.
६) अपर मुद्रांक नियंत्रक,प्रधान मुद्रांक कार्यालय,मुंबई.
७) सर्व नोंदणी उपमहानिरीक्षक,नोंदणी व मुद्रांक विभाग.
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९) निवडनस्ती ,म-१ कार्यासन,महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.